**महाराष्ट्र पाटबंधारे वित्तीय कंपनी मर्यादित मार्फत मालिका-३ व ४ द्वारे उभारलेल्या कर्जरोख्यांवरील हमी शुल्क पुस्तकी समायोजनाने शासनास अदा करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**नियोजन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एमपीव्हीसीएल-२०१४/प्र.क्र.१५/का.१४३३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : ०१ ऑक्टोंबर, २०१४

**वाचा — शासन निर्णय क्रमांकः पाविम-२००२/प्र.क्र.४७/का.१४३३, दिनांक २७ सष्टेंबर, २००२**

**प्रस्तावना —**

राज्यातील पाच पाटबंधारे महामंडळांना निधी उपलब्ध करण्यासाठी खुल्या बाजारातून कर्जरोख्याद्वारे निधीची उभारणी करुन या निधीची वाटप मा.राज्यपालांच्या निदेशानुसार करण्यासाठी महाराष्ट्र शासनाने "महाराष्ट्र पाटबंधारे वित्तीय कंपनी मर्यादित" या विशेष हेतु वहन (SPV) कंपनीची स्थापना केली आहे. सदर कंपनीचे दैनंदिन कामकाज व व्यवस्थापन मे.सिकॉम लि. यांचे मार्फत केले जाते. कर्जरोखे मालिका I,II,III व IV द्वारे कंपनीने उभारलेल्या एकूण रु.७९८.२५ कोटी रोख्यांच्या मुद्दल व व्याजास शासनाने हमी दिलेली आहे. सन २०१४-१५ मधील पहिल्या सहामाहीकरीता शासन हमीची रक्कम रु.६,५२,४९,०००/- (रु. सहा कोटी बावण्ण लाख एकोणपन्नास हजार फक्त) आहे. सदरहू हमीची रक्कम शासनास पुस्तकी समायोजनाने अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय—**

वरील प्रस्तावनेत नमूद केल्यानुसार कंपनी मार्फत उभारलेल्या एकूण रु.७९८.२५ कोटी कर्जरोख्यांवरील व्याज व मुद्दलपैकी मालिका-३ व ४ द्वारे उभारलेल्या कर्जरोख्यांवरील यासाठीचे सन २०१४-१५ मधील पहिल्या सहामाहीचे शासन हमी शुल्क रु.६,५२,४९,०००/- (रुपये सहा कोटी बावन्न लाख एकोणपन्नास हजार फक्त) पुस्तकी समायोजनाने शासनास अदा करण्यास अदा करण्यास या निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

२. वरील प्रयोजनासाठीचा खर्च मुख्यलेखाशिर्ष "मागणी क्र.ओ-१२, ५४६५- सर्वसाधारण वित्तीय व व्यापारी संस्थांमधील गुंतवणूका, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ०१-सर्वसाधारण वित्तीय व व्यापारी संस्थामधील गुंतवणूका, १९०-सार्वजनिक क्षेत्र, इतर उपक्रम व बँका इत्यादिमधील गुंतणूका, (०१)- महाराष्ट्र पाटबंधारे वित्तीय कंपनी मर्यादितसाठी भागभांडवल व सेवा शुल्क (०१) (०१)- महाराष्ट्र पाटबंधारे वित्तीय कंपनी मर्यादितसाठी व सेवाशुल्क (दत्तमत योजनेतर) (५४६५ ००४६) ५४, गुंतवणूका"

लेखाशीर्षाखालील सन २०१४-१५ या वर्षासाठी मंजूर झालेली मूळ अर्थसंकल्पित तरतूद रु.४२,०६,१३,०००/- (रु.बेचाळीस कोटी सहा लाख तेरा हजार फक्त) तेसच सन २०१४-१५ मधील पावसाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित करण्यात आलेली रु.२१,९६,६७,०००/- (रु. एकवीस कोटी शहाण्णव लाख सदुसष्ट हजार फक्त) अशा एकूण रु.६४,०२,८०,०००/- (रु.चौसष्ट कोटी दोन लाख ऐंशी हजार फक्त) एवढया तरतुदीमधून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१००११२३०१८८११६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vasant Shankar Kulkarni

Digitally signed by Vasant Shankar Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vasant Shankar Kulkarni
Date: 2014.10.01 12:42:06 +05'30'

**( व.शं.कुळकर्णी )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल १/२, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्रराज्य, मुंबई / नागपूर

२. महालेखापाल १/२, (लेखा व परीक्षा), महाराष्ट्रराज्य, मुंबई / नागपूर

३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.

४. सहसचिव, रोख शाखा, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

५. व्यवस्थापकीय संचालक, मे.सिकॉम लि. सॉलिटिअर कार्पोरेट बिल्डिंग नं.४, अंधेरी-घाटकोपर, लिंक रोड, चकाला, अंधेरी (पूर्व), मुंबई-४०० ०९३.

६. प्रबंधक, महाराष्ट्र पाटबंधारे वित्तीय कंपनी लिमिटेड, द्वारा मे.सिकॉम लि.सॉलिटिअर कार्पोरेट बिल्डिंग नं.४, अंधेरी-घाटकोपर लिंक रोड, चकाला, अंधेरी (पूर्व), मुंबई-४०० ०९३.

७. कार्यासन अधिकारी, रोख शाखा, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई (५) प्रती.

८. वित्त विभाग, व्यय-८/अर्थसंकल्प-३/अर्थसंकल्प-१६/अर्थबळ/अर्थोपाय/ऋण व हमी.

९. कक्ष अधिकारी का-१४२४, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

१०.निवड नस्ती का-१४३३, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.